**कार्यकारी अभियंता (स्थापत्य)**
**<u>यांच्या बदल्या / नियुक्त्या</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
शासन आदेश क्रमांक : पीओजी-१११४/प्र.क्र.२७०/(४)/सेवा-१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ५ फेब्रुवारी, २०१५

**पहा :-** शासन आदेश क्रमांक : टीएफएस-१११४/प्र.क्र.१००/(१)/सेवा-१, दि.१७ जुलै, २०१४

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन शासन आदेशान्वये श्री. एम. के. भरसट, कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, नांदेड यांची बदली कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, लातूर या पदावर करण्यात आली होती. तथापि, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, प्रशासकीय कारणास्तव संदर्भाधीन शासन आदेशात याद्वारे अंशत: बदल करण्यात येत असून, आता त्यांची बदली कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, बीड-२ या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. एम. के. भरसट, कार्यकारी अभियंता यांनी बदलीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जावू नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक सीडीआर-१०८२/२५६७/ २८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री. एम. के. भरसट, कार्यकारी अभियंता यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०६१७२५००६७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sampat Dasharath Suryavanshi

Digitally signed by Sampat Dasharath Suryavanshi
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sampat Dasharath Suryavanshi
Date: 2015.02.06 17:32:23 +05'30'

**( सं. द. सुर्यवंशी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ औरंगाबाद/ नाशिक/नागपूर/ अमरावती/ विशेष प्रकल्प, मुंबई/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
३. सह सचिव (सं.नि.). सा. बां. विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड / उस्मानाबाद,
५. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कॅंप पुणे,
६. महालेखापाल-१, ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. महालेखापाल-२, ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड / लातूर,
९. श्री. एम. के. भरसट, कार्यकारी अभियंता
   द्वारा : मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद
१०. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१२. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ,
१३. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,

१४. मा. अ. मु. स. (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,

१५. मा. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,

१६. कार्यासन प्रशा-२, आस्था- ३, सेवा-६ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

१७. कार्यासन संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१८. कार्यासन- सेवा-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (निवड नस्तीसाठी),